महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत अनुसुचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना खाजगी नळ जोडणी व वैयक्तिक शौचालये उपलब्ध करुन देण्याकरिता परभणी महानगरपालिकेच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी प्रदान करुन राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदानाचा पहिला हप्ता वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्रमांकः नादव-२०१४/ प्र.क्र. ३२७ /पापु-२२

जी.टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
तारीख: ५ सप्टेंबर, २०१४.

वाचा :

१) शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग नादव-२०१०/प्र.क्र.२१९/पापु-२२, दिनांक २५/६/२०१०,
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. नादव-२०१०/प्र.क्र.२९६/पापु-२२, दिनांक ४/१/२०११,
३) शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.नादव-२०१०/प्र.क्र.५०८/पापु-२२, दिनांक १४/१/२०११,
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.नादव-२०११/खानवैशौ/अनुदान/ प्र.क्र. १५४/पापु-२४, दिनांक १८/३/२०११ व दिनांक ३१/३/२०११,
५) आयुक्त, महानगरपालिका, परभणी, जि.परभणी यांचे पत्र क्र.३८०, दि. २७/०२/२०१३,
६) मुख्य अभियंता, मजीप्रा, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांचे पत्र क्र.१२३६, दिनांक २२/०८/२०१४ .

प्रस्तावना :

महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त दिनांक २५ जून, २०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्याच्या नागरी भागातील अनुसुचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालये उपलब्ध करुन देण्याकरिता नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेबाबत तरतूद करण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत प्रकल्प प्रस्ताव तयार करुन शासनाकडे सादर करताना नागरी स्थानिक संस्थांनी अनुसरावयाची अतिरिक्त मार्गदर्शक तत्वे संदर्भीय दिनांक १४ जानेवारी, २०११ च्या शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेली आहे. या

**योजनेंतर्गत नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना खाजगी नळ जोडण्यासाठी रु.४०००/- प्रतिकुटुंब तर वैयक्तिक शौचालय बांधकामासाठी रु.१२०००/- प्रतिकुटुंब शासकीय अनुदान अनुज्ञेय आहे. या योजनेअंतर्गत खाजगी नळजोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी प्रकल्प प्रस्तावाच्या एकूण किंमतीच्या ९०% शासकीय अनुदान अनुज्ञेय असून १०% रक्कम संबधित लाभार्थी किंवा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानी उपलब्ध करुन द्यावयाची आहे.**

२. महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत नागरी संस्थांच्या प्रस्तावांना मान्यता देण्यासंदर्भात मा. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समन्वय समितीच्या दिनांक ०४ फेब्रुवारी, २०१४ रोजी आयोजित केलेल्या बैठकीमध्ये **परभणी महानगरपालिकेच्या** प्रस्तावाला, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांचेकडून तांत्रिक मुल्यांकन व तांत्रिक मंजूरी घेण्याच्या अटीच्या अधीन राहून, मान्यता देण्यात आली आहे.

३. आयुक्त, महानगरपालिका, परभणी यांचे संदर्भ क्र.५ वरील पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार मुख्य अभियंता,मजीप्रा,प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा,पुणे यांनी संदर्भ क्र.६ वरील दि.२२.०८.२०१४ च्या पत्रान्वये वैयक्तिक शौचालयासाठी रु.१२०००/- ऐवजी रु.३५५५६/- व खाजगी नळ जोडणीसाठी रु.४०००/- ऐवजी रु.४४३९/- प्रतिकुटुंब प्रमाणे परिगणती केली असून प्रभाग क्र.३ व २५ करिता वितरण वाहिनी टाकणे या उपांगासह **रु.१३,९७,२१,९१०/-** किंमतीच्या प्रस्तावास तांत्रिक मान्यता दिली आहे. परंतु नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबियांना खाजगी नळ जोडणीसाठी रु.४०००/- प्रतिकुटुंब तर वैयक्तिक शौचालय बांधकामासाठी रु.१२०००/- प्रतिकुटुंब शासकीय अनुदान अनुज्ञेय आहे. त्यामुळे **शासनाकडून मंजूर करण्यांत येत असलेल्या रक्कमे व्यतिरिक्त उर्वरित रक्कम लाभार्थी अथवा महानगरपालिकेने उभारावयाची आहे.**

४. उपरोक्त बाबीचा विचार करता, **परभणी महानगरपालिकेच्या** प्रस्तावातील खाजगी नळ जोडणी व वैयक्तिक शौचालयांसाठी परिगणती नुसार येणारी किंमत व प्रभाग क्र.३ व २५ करिता HDPE पाईप वितरण नलिका टाकणे या कामांसह निव्वळ **रु.६,६४,८१,१९०/-** आणि त्यावरील २% सल्लागार शुल्क, १% त्रयस्थ यंत्रणेमार्फत तपासणी शुल्क व तांत्रिक मंजूरी शुल्क यासह **परभणी महानगरपालिकेच्या** एकुण ढोबळ **रु. ६,९७,९४,३२५/-(रु.सहा कोटी सत्त्याण्णव लाख चौऱ्याण्णव हजार तीनशे पंचवीस फक्त)** किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

**महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांमधील कुटुंबीयांना खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालय उपलब्ध करुन देण्यासाठी राबविण्यात येणाऱ्या योजनेअंतर्गत परभणी महानगरपालिकेच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत परभणी महानगरपालिकेसाठी मंजूर करण्यात आलेली कामे आणि त्यांच्या मंजूर किंमतीचे विवरण खालीलप्रमाणे आहे :-**

| अ.क्र. | उपांगाचे नांव | मंजूर किंमत रु. |
|---|---|---|
| १. | खाजगी नळजोडणी - २८५० X रु.४००० | **रु. १,१४,००,०००** |
| २. | वैयक्तिक शौचालये - २७२३ X रु.१२००० | **रु. ३,२६,७६,०००** |
| ३. | प्रभाग क्र.३ व २५ मध्ये HDPE पाईप वितरण नलिका टाकणे | **रु. २,२४,०५,१९०** |
| | **एकुण रु.** | **रु. ६,६४,८१,१९०** |
| | **२ % सल्लागार फी** | **रु. १३,२९,६२३** |
| | **१ % त्रयस्थ यंत्रणेमार्फत तपासणी फी** | **रु. ६,६४,८१२** |
| | **तांत्रिक मंजूरी शुल्क** | **रु. १३,१८,७००** |
| | **ढोबळ किंमत रु.** | **रु. ६,९७,९४,३२५** |

२. **सदर योजनेअंतर्गत वित्तीय आकृतीबंध खालील प्रमाणे राहील :-**

| अ. क्र. | नागरी संस्थेचे नांव व वर्ग | योजनेंची किंमत | अनुज्ञेय अनुदान (९० %) | नागरी संस्थेचा सहभाग (१० %) | १ ल्या हप्त्याचे वितरीत करावयाचे ५०% अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १. | **परभणी महानगरपालिका, ड वर्ग** | **रु.६,९७,९४,३२५** | **रु.६,२८,१४,८९३** | **रु.६९,७९,४३३** | **रु.३,१४,०७,४४७** |

३. नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत **परभणी** महानगरपालिकेस या शासन निर्णयान्वये पहिल्या हप्त्यापोटी शासनाच्या अनुज्ञेय अनुदानापैकी ५०% म्हणजे **रु.३,१४,०७,४४६/- (रुपये तीन कोटी चौदा लाख सात हजार चारशे सेहचाळीस फक्त)** इतके अनुदान वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**४. परभणी शहरासाठी मंजूर केलेल्या कामांस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे :-**

१. या योजनेंतर्गत समाविष्ट असणारे लाभार्थी हे अनुसुचित जाती व नवबौध्द घटकातील असल्याबाबत प्रमाणपत्र आयुक्त, महानगरपालिका, परभणी यांनी दिले असून योजनेंत समाविष्ट लाभार्थी अनुसुचित जाती व नवबौध्द घटकातील असल्याबाबतची खात्री करण्याची तसेच प्रस्तावातील यादीमध्ये समाविष्ट असलेल्या लाभार्थ्यांनाच या योजनेचा लाभ देण्याची जबाबदारी महानगरपालिकेची राहील. या संदर्भात कोणत्याही प्रकारची तक्रार आल्यास त्या बाबतची कागदपत्रे शासनास सादर करणे महानगरपालिकेस अनिवार्य राहील.

२. या योजनेंतर्गत मंजूर रक्कमेपेक्षा जास्त खर्च झाल्यास तो संबंधित लाभार्थी अथवा महानगरपालिकेने करावयाचा असून त्यासाठी शासनाकडून कोणतेही वाढीव अनुदान मंजूर करण्यांत येणार नाही.

३. या योजनेअंतर्गत लाभ घेणाऱ्या लाभार्थ्यांना अन्य कोणत्याही पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेअंतर्गत वैयक्तिक नळ जोडणी व वैयक्तिक शौचालयाकरिता या अगोदर लाभ मिळालेला नाही असे प्रमाणपत्र आयुक्त, महानगरपालिका यांनी देणे आवश्यक आहे.

४. या योजनेंतर्गत वैयक्तिक नळ जोडणी देताना योग्य तो दर्जा राखण्याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या दि.१२ एप्रिल, २०१२ च्या परिपत्रकान्वये मार्गदर्शनपर सूचना देण्यात आल्या आहेत. त्या सुचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी महानगरपालिकेने करणे आवश्यक आहे. विशेषत: नळजोडणी देताना उत्कृष्ट दर्जा असलेले व जीआय पाईपला पर्यायी पाईप्स म्हणून केंद्र शासनाने विशेष प्राधान्य दिलेले एम.डी.पी.ई. पाईप, अनुषंगिक फिटींग्स् व जॉईंटचा वापर करावा. पाईपचा दर्जा आयएसओ स्पेसिफिकेशन प्रमाणे असणे आवश्यक आहे.

५. महानगरपालिकेच्या पाणी पुरवठा व मलनि:स्सारण योजनेसाठी नागरी संस्थेने स्वतंत्र लेखे ठेवणे, सिंकींग फंडाची तरतूद करणे, तसेच बिले देणे व वसुलीत वाढ करणे अनिवार्य राहील.

६. या योजनेंतर्गत नागरी दलित वस्ती व नवबौध्द कुटुंबियांना वैयक्तिक शौचालय व नळ जोडणी उपलब्ध करुन देण्यासाठी त्रयस्थ यंत्रणेकडून तपासणी करणे आवश्यक असून ही तपासणी मजीप्राकडून करुन घ्यावी व त्यासाठी धोरणानुसार अनुज्ञेय शुल्क अदा करण्यात येईल.

७. वैयक्तिक नळ जोडणी व शौचालय उपलब्ध करुन देताना सर्व कामामध्ये समानता असणे आवश्यक असून याची दक्षता महानगरपालिकेने घ्यावी.

८. या योजनेस मंजूरी मिळाल्यावर वरीलप्रमाणे सर्व प्रक्रिया पूर्ण करुन योजनेचे काम १ महिन्याच्या आत सुरू करावे आणि योजना ६ महिन्यांत पूर्ण करण्यात यावी. तशी कार्यवाही न केल्यास मंजूरीचा आदेश रद्द करण्यात येईल.

९. महानगरपालिकेने शासनाकडे सादर केलेल्या प्रस्तावातील कामांसाठी मंजूर करण्यात आलेल्या किंमतीमधील शासनाकडून देय ठरविलेल्या सल्लागार शुल्कापैकी खाजगी सल्लागारांकडून तयार करून घेण्यात आलेल्या प्रस्तावांसंदर्भात प्रस्तावातील वैयक्तिक नळजोडणी व वैयक्तिक

शौचालय या मुख्य कामांकरिता मंजूर केलेल्या किंमतीच्या २% पर्यंत सल्लागार फी खाजगी सल्लागारांना देण्यात यावी आणि महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत प्रस्तावातील कामांकरिता तांत्रिक तपासणी (appraisal) व तांत्रिक मंजूरी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून करून घ्यावी व त्याबाबतचे सेवाशुल्क महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास अदा करण्यात यावे.

१०. महानगरपालिकेने त्यांचेकडे असलेली महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची आयुर्विमा महामंडळाचे कर्ज, इतर कर्ज, पाणीपट्टी व विलंब आकार इत्यादि थकबाकीची रक्कम त्वरित महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे जमा करावी.

११. नागरी दलित वस्ती योजनेंतर्गत आतापर्यंत मंजूर झालेल्या सर्व योजनांतील कामांच्या अंमलबजावणीचे संनियंत्रण करण्याची व योजनेवर प्रत्यक्ष होणारा खर्च याबाबतचा आढावा घेण्याची व्यवस्था संबंधित जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांनी निर्माण करुन त्या बाबतचा अहवाल दर महिन्याला सचिव, समाज कल्याण विभाग यांना सादर करावा.

१२. महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करून घेण्यासाठी संदर्भीय दिनांक २५ जुन, २०१० च्या शासन निर्णयातील परिच्छेद १५ नुसार राष्ट्रीयकृत बॅंकेत स्वतंत्र खाते उघडणे आणि त्या खात्यात नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या सहभागाची रक्कम जमा करणे बंधनकारक राहील. संबंधित खाते क्रमांक महानगरपालिकेने महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कार्यालयास परस्पर कळवावा.

१३. महानगरपालिकेने सदर योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेच्या प्रगतीचा अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे नियमितपणे शासनास सादर करावीत. राज्य शासनाकडून देण्यात येणाऱ्या पहिल्या हप्त्याच्या अनुदानापैकी ७०% अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे नागरी संस्थेकडून शासनाकडे सादर करण्यात आल्यानंतर आणि महानगरपालिकेने स्वत:च्या हिश्श्याच्या पूर्ण रक्कमेचा राष्ट्रीयकृत बँकेतील स्वतंत्र खात्यात भरणा केल्यानंतरच राज्य शासनाचे उर्वरित अनुज्ञेय अनुदान वितरित करण्यात येईल.

१४. महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेंतर्गत राज्याच्या नागरी भागातील सर्व अनुसूचित जाती व नवबौध्द कुटुंबियांकडे खाजगी नळ जोडण्या व वैयक्तिक शौचालये उपलब्ध होण्यासाठी हा कार्यक्रम यशस्वीरित्या राबविणे अत्यंत आवश्यक आहे. त्यामुळे महानगरपालिकेने या कार्यक्रमाची अंमलबजावणी विहीत कालमर्यादेत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

५. सदर योजनेअंतर्गत नगर परिषदेस अनुज्ञेय होणाऱ्या अनुदानावरील खर्च हा मागणी वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता,०१, पाणी पुरवठा, १९२, महानगरपालिका/नगर परिषदांना सहाय्य, (०२) राज्य योजना (१२) महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था )नागरी भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द कुटुंबियांना खाजगी नळ जोडणी व वैयक्तिक शौचालये यासाठी सहाय्यक अनुदान ( २२१५ ९३१६ ),३१ सहाय्यक अनुदान या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून

भागविण्यात यावा. **त्या अनुषंगाने, सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध करून दिलेल्या निधीमधून अनुदानाची पहिल्या हप्त्याची रक्कम परभणी महानगरपालिकेस वितरित करुन अनुदान वितरणाचे लेखे ठेवावेत. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत या योजनेअंतर्गत प्रत्यक्ष अनुदान वितरणाचे आदेश वेळोवेळी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास देण्यात येतील, या आदेशांच्या अनुषंगाने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने अनुदान वितरीत करावे.**

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०५१२१७१८९१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sule Vaishali M

Digitally signed by Sule Vaishali M
DN: CN = Sule Vaishali M, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2014.09.05 13:26:41 +05'30'

**( वैशाली सुळे )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव,
३. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव,
४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
५. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
६. उप सचिव,पापु-०४,पापु-२० व पापु-२४,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई,
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, परिमन पॉईंट, मुंबई,
८. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई,
९. संचालक, समाज कल्याण संचालनालय, मुंबई,
१०. महालेखापाल-१ मुंबई,
११. महालेखापाल-२ नागपूर,
१२. आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई,
१३. संचालक, लेखाकोषागार, मुंबई,
१४. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे,

१५. महापौर / आयुक्त, परभणी महानगरपालिका, जि.परभणी,
१६. उपआयुक्त, नगरपालिका प्रशासन कक्ष, विभागीय आयुक्त, महसुल विभाग औरंगाबाद,
१७. विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी, परभणी,
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी,
१९. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, परभणी,
२०. जिल्हा प्रकल्प अधिकारी, नगरपरिषद प्रशासन,जिल्हाधिकारी कार्यालय,परभणी,
२१. निवडनस्ती पापु-२२,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई.